# जन वाचन आंदोलन





जनवाचन आंदोलन हे पुस्तकांना गावागावात घेऊन जाणारे आंदोलन आहे. नवसाक्षर व अर्धशिक्षित लोकांमध्ये पुस्तकांचे सामुदायिक वाचन करणे, ते ऐकणे आणि ऐकवणे हा याचा उद्देश आहे. आज गावातल्या लोकांपर्यंत पुस्तके पोचत नाहीत. त्यांची भाषा त्यांना उमगत नाही आणि किंमती परवडत नाहीत. अशा नव-वाचकांपर्यंत पुस्तके पोचवण्याचे काम भारत ज्ञान विज्ञान समितीने अंगिकारले आहे. ही पुस्तके प्रसिद्ध लेखकांची आणि सोपी, सुटसुटीत व स्वस्त किंमतीत असावीत असा प्रयत्न आहे.

या आंदोलनातून काय साध्य होईल?

गावागावात जनवाचनाची व जनवाचनालयांची संस्कृती निर्माण होईल. साक्षरता आंदोलनातून हस्तगत केलेली अक्षरकौशल्ये लोक स्वत: विकसित करू शकतील. त्यांच्या ज्ञानविज्ञानाच्या कक्षा विस्तारतील. त्यांच्या सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक जाणिवांची पातळी उंचावू शकेल. आपल्या मूलभूत हक्कांच्या आणि एकंदर परिवर्तनाच्या लढ्यासाठी जागृत होऊन ते उभे ठाकू शकतील.

देशातील लोकशाही टिकण्यासाठी आणि अर्थपूर्ण होण्यासाठी हे आवश्यक आहे. साक्षरता म्हणजे केवळ अक्षर ओळख नव्हे तर संपूर्ण जग जाणण्याचे ते कार्य आहे. या दिशेने, गावागावातील लोकांच्या खांद्याला खांदा भिडवून, आम्ही पुढे जाऊ इच्छितो.




भारत ज्ञान विज्ञान समिती
किंमत रु. २-५०

# डॉ. रखमाबाई

सीमा केतकर



भारत ज्ञान विज्ञान समिती

पुस्तकाचे नाव : डॉ. रखमाबाई

लेखिका : सीमा केतकर

संपादन : विनया देशपांडे/अद्वैत पेडणेकर

चित्रकार : नंदिनी ताडपत्रीकर

जवाआं/१७

प्रकाशन : फेब्रुवारी १९९७

नववाचकांसाठी भारत ज्ञान विज्ञान समिती तर्फे राष्ट्रीय साक्षरता मिशनच्या सहकार्याने देशभर चालवल्या जात असलेल्या 'जनवाचन आंदोलन' मोहिमेसाठी प्रकाशित

मूल्य : २ रुपये ५० पैसे



प्रकाशक : दत्ता देसाई
राज्य समन्वयक, भारत ज्ञान विज्ञान समिती (महाराष्ट्र)
अक्षय, २१६, केळकर रस्ता, नारायण पेठ, पुणे ४११०३०
फोन : ४५६६९४
मुद्रण स्थळ : महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय, पुणे ४११००४

अक्षर जुळणी व मांडणी : दिनानाथ मनोहर

# डॉ. रखमाबाई

बाईचं बाईपण अगदी लहानपणीचं सुरू होतं. त्यात घरची गरिबी असेल तर बघायलाच नको. कोवळ्या वयातच धाकल्यांचा सांभाळ करणं, सारवणं, विहिरीवरून पाणी भरणं, चारा आणणं सारं सुरूच. खेळायचं नाही, घराबाहेर जायचं नाही, मोठ्यानं हसायचं सुद्धा नाही.

मुलगी जरा वयात आली की सुरू लग्नाची घाई. तिला काय वाटतं? तिची इच्छा काय, याकडं कोण पहातं? तिलाही मन आहे, तिचीही स्वप्नं आहेत याचा कुणी विचार करतं? जणू लग्न, मुलं बाळं, संसार हेच तिचं काम. जणू तेवढंच तिचं जीवन! तिलाही शिकावं वाटतंच स्वत:च्या पायावर उभं राहावं वाटतं, एखादी कला यावी असं तिलाही वाटतं, पण असं कुणी म्हटलं तर? 'छी, छी! काय हे अवलक्षण' असं म्हटलं जातं. बायका शिकल्या म्हणून गोंधळ झालाय असं म्हणणारे आजही आहेत. त्या पुढं गेल्या तर धर्म बुडेल, मुली घराबाहेर पडायला लागल्या तर अनाचार माजेल, असं म्हणणारे आजही काय कमी आहेत? मग विचार करा, शंभर सव्वाशे वर्षांपूर्वी काय परिस्थिती असेल?

त्यावेळची परिस्थिती तर फारच वाईट होती. मुलींची लग्नं अगदी लहान वयात केली जात. अगदी पाळण्यातसुद्धा

लग्नं होत असत. तेव्हा नवऱ्याबद्दल मुलीलाही आवड निवड असावी असं कुणी मानणं शक्यच नव्हतं. कारण बायकांची अक्कल ती काय? चुलीपुरतीचं. त्यांना जगातलं काय कळतंय? त्यांना ताब्यात ठेवणारा नवराच हवा, असा पक्का समज होता. त्यामुळं वयस्कर नवऱ्यांच्या दावणीला कोवळ्या मुलींना बांधलं जायचं. पती कसाही असला तरी तो परमेश्वर असं शिकवलं जायचं. त्यामुळं त्यानं लाथा-बुक्यांनी मरेस्तोवर मारलं, झोडपलं तरी त्याच्याजवळ राह्यचं. त्याच्या विरूद्ध चकार शब्द काढायचा नाही. त्याच्या तालावर नाचणं म्हणजे संसार! त्याकाळी उच्चजातीत नवरा मेला तर त्याच्याबरोबरच चितेवर बायकोला जाळलं जायचं. विधवांना जिवंतपणी मेल्या मढ्यासारखं जगायला लागायचं. त्यांचं मुंडन करून त्यांना विद्रूप केलं जायचं. त्यांना शुभ कार्याला येऊ दिलं जायचं नाही. उच्च जातीत त्यांच्या पुनर्विवाहाला बंदी होती. असं गुलामीचं परावलंबी जिणं होतं.

अशा या काळात एक साधारण कुटुंबातील मुलगी खंबीरपणे, तेजस्वी आयुष्य जगली. या गुलामगिरीला विरोध करण्याचं धाडस तिनं दाखवलं. एक वेगळं आयुष्य जगायचं तिनं ठरवलं आणि तसं जगून दाखवलं. स्त्रीला स्वत:चे निर्णय घेता येतात. आपल्या मताप्रमाणे जगायचं ठरवलं तर ती स्वाभिमानानं, प्रतिष्ठेनं जगू शकते हे तिनं जगाला दाखवून दिलं. ती शिकली, परदेशात जाऊन डॉक्टर झाली आणि सर्वसामान्य स्त्रियांच्या कल्याणासाठी झटली. त्या



बंडखोर स्त्रीचं नाव होतं रखमा.

## कौटुंबिक पार्श्वभूमी

रखमाचा जन्म २२ नोव्हेंबर १८६४ रोजी झाला. आईचनाव जयंतीबाई आणि वडलाचं नाव जनार्दन पांडुरंग सावे. रखमाबाईचे वडील बांधकाम कंत्राटदार होते. रखमाबाई अडीच तीन वर्षांची असतानाच काविळीने त्यांचा मृत्यू

अर्जुन सखाराम



झाला. अवघ्या १७ वर्षांच्या जयंतीबाई लहानग्या रखमाला घेऊन स्वत:च्या वडलांकडे राहायला आल्या. त्यांचे वडील हरिश्चंद्र यादव यांना समाजात मान व प्रतिष्ठा होती. हे सर्व

कुटुंब पाचकळशी होतं. या जातीमध्ये विधवा स्त्रियांना परत लग्न करण्याची परवानगी होती. त्यामुळं वडलांनी जयंतीबाईचं पुन्हा लग्न लावून दिलं. त्यांच्या दुसऱ्या नवऱ्याचं नाव होतं सखाराम अर्जुन. सखाराम अर्जुन हे खूप प्रसिद्ध डॉक्टर होते. स्त्रियांबद्दल त्यांचा दृष्टिकोन पुरोगामी होता. स्त्रियांच्या आरोग्याविषयी त्यांनी पुस्तकं लिहिली होती. वर्तमानपत्रातूनही त्यांनी लिखाण केले होते. ते सतत समाज सुधारणेसाठी धडपडत. आपली सावत्र मुलगी रखमाचा त्यांनी चांगला सांभाळ केला. मराठी शाळेत ती शिकली. ती ११ वर्षांची झाल्यावर वडलांनी तिचं लग्न नात्यातील दादाजी भिकाजी बरोबर लावून दिलं.

तिला शिक्षणाची खूप आवड. ती घरी राहूनच इंग्रजी शिके. त्यांच्या जातीत चांगली शिकलेली मुलं मिळत नव्हती. म्हणून साधारण शिकलेल्या होतकरू दादाजी बरोबर तिचं लग्न झालं होतं. मात्र लग्न ठरवताना त्यानं आपण स्वत: शिक्षण घेऊ असं वचन दिलं होतं.

त्या काळातील रिवाजाप्रमाणं लग्नानंतर काही वर्षं रखमा आपल्या माहेरीच राहात होती. दादाजीशी म्हणजे नवऱ्याशातिचे वैवाहिक संबंध आले नव्हते. दादाजीनं दिलेलं वचन पाळलं नाही. लग्न झाल्यावर काही दिवसांतच दादाजीची आई वारली. तो मामाकडं राहू लागला. तो सारखा आजारी असायचा. त्याला टीबी म्हणजे क्षय झाला होता. तरी पुढे



रखमाबाईने नांदायला यावं असा निरोप दादाजीने पाठवला. पण दादाजीच्या मामाचे चारित्र्य चांगले नव्हते. दादाजीला स्वत:चे घर नव्हते.तो मामाकडे राह्यचा आणि त्याची प्रकृतीही चांगली नव्हती. वाईट चालीच्या मामाकडं रहायला कसं जायचं? या कारणांमुळे दादाजीबरोबर नांदायला रखमानं नकार दिला. शिवाय आपण पुढं शिक्षण घेऊ असं दिलेलं वचनही त्यानं पाळलं नव्हतं. म्हणून रखमाच्या आईवडिलांनीही तिला नांदायला पाठवलं नाही.

## रखमाबाईचा खटला

कसाही असला तरी नवरा श्रेष्ठ मानण्याचा तो काळ. त्या काळात दादाजीला हे कसं सहन व्हावं? त्याचा घोर अपमान झाला! शिवाय जातींतील सनातनी पुढारी होतेच आग भडकवायला. त्यांच्या चिथावणीमुळं दादाजी आणखी चिडला. त्यानं वकिलाकडं धाव घेतली. वकिलाकडून रखमाबाईला नोटिस पाठवली. पण तिनं नोटिशीला दाद दिली नाही. शेवटी दादाजीने १८८४ साली कोर्टात व्हावा दाखल केला. रखमाबाईला आपल्याबरोबर नांदायला कोर्टानं भाग पाडावं असा आग्रह धरला.

हे ऐकून आश्चर्य वाटलं? का आजदेखील असंच चाललंय, असा विचार मनात आला?

तिनं कोर्टापुढं आपली बाजू खणखणीतपणे मांडली. तिनं कोर्टाला सांगितलं, 'मी लहान वयाची असताना माझं लग्न लावून देण्यात आलं . त्यावेळी मला काय कळत होतं? खरंतर तो मला पसंत नाही. शिवाय कबूल करूनही दादाजीनं पुढील शिक्षण घेतलेलं नाही. तो सतत आजारी असतो. अशा माणसाबरोबर कसा संसार करणार? मला त्याच्याबरोबर नांदायचं नाही. कोर्टानं तिच्या बाजूनं निकाल दिला. निकाल देताना न्यायमूर्तींनी असं म्हटलं की, एखादा पुरुष आवडत नसताना स्त्रीवर सक्ती किंवा जबरदस्ती करणं हा रानटीपणाच आहे. एखादी स्त्री नवऱ्याबरोबर राहावयास तयार नसेल तर एखाद्या जनावराचा, घोड्याचा किंवा बैलाचा जबरदस्तीनं ताबा मिळवावा त्याप्रमाणे तिचा ताबा मिळवणं हे असंस्कृतपणाचं आहे.



हा निकाल ऐकल्यावर हिंदू सनातनी खवळले. धर्म बुडाला, समाजाला कीड लागली, सगळी नीतिमत्ता संपली अशी ओरड त्यांनी सुरू केली.पण त्यांचा खरा राग काय



होता? त्यांना कशाची भीती वाटत होती? तर उद्या अन्याय झालेल्या अशा सर्व स्त्रिया उठल्या तर? त्या नको असलेल्या नवऱ्यांपासून न्यायालयाकडून फारकत घेतील, मग धर्माचं काय होणार? नवऱ्यांचं काय होणार?

आजही हे समाजाच्या पचनी पडत नाही. मग शंभर वर्षांपूर्वी या निकालानं कसा गदारोळ उडाला असेल ह्याची कल्पनाच केलेली बरी. नवऱ्याला बायको आवडत नाही म्हणून तो दुसरं लग्न करू शकतो, तिला सोडू शकतो. तो जणू काही त्याच्या कर्तबगारीचा पुरावाच असतो. परंतु स्त्रियांना मात्र असा कोणताही हक्क देणं समाजाला मान्य नव्हतं. स्त्रियांना हवा तसा निकाल कोर्ट कसं देतं? म्हणून चिडून पुढाऱ्यांनी त्या विरोधात वर्तमानपत्रात एका पाठोपाठ लेख लिहीले, पत्रं लिहीली. त्याला उत्तर देण्यासाठी रखमाबाईनं देखील 'हिंदू लेडी' या टोपण नावाने इंग्रजी दैनिकात पत्रं लिहिली. बालविवाह, सक्तीच वैधव्य या प्रथेविरूद्ध प्रचार केला.



या निकालाच्या विरोधात साहजिकच दादाजी वरच्या कोर्टात गेला. त्यावेळी प्रसिद्ध समाजसुधारक काशीनाथ पंत तेलंग यांनी रखमाबाईची बाजू मांडली. रखमाबाईनं विवाहाला कधीच संमती दिली नव्हती व दादाजीला आपला नवरा मानलं नव्हतं असा युक्तीवाद त्यांनी केला. अर्थातच न्यायालयाला हे म्हणणं मान्य झालं नाही. निकाल दादाजीच्या बाजूनं लागला. रखमाबाईने दादाजीबरोबर नांदावयास जावं असा आदेश कोर्टानं १८८७ मध्ये दिला. जर रखमाबाईनं हा आदेश मोडला तर तिला सहा महिन्याची शिक्षा भोगावी लागेल असं सांगितलं. तसेच खालच्या कोर्टाचा खर्च रखमाबाईने द्यावा व नंतरचा खर्च दोघांनी वाटून घ्यावा असेही फर्मान कोर्टानं काढलं.

या निकालामुळं आधी उठलेलं वादळ निवलं. सनातन्यांचा विजय झाला होता. धर्मावरंच संकट टळलं, असंच त्यांना वाटलं. स्त्रियांवरचे संकट कायम राहिल्याविषयी त्यांना देणं-घेणं नव्हतं. स्त्रीची पुढं पडणारी पाऊलं पुन्हा एकदा जखडून टाकणारा हा निकाल होता. पण रखमाबाई डगमगली नाही. अजाणत्या वयलग्नामुळं झालेलं नुकसान भरून काढण्याची तिची तयारी होती. त्यासाठी शिक्षा भोगायला ती तयार होती. तसा निरोपही तिनं कोर्टाला पाठवला होता. या खटल्याच्या सुमारासच तिचे वडील वारले. तरीदेखील तिच्या आईने व आजोबांनी तिला मदत केली व धीर दिला.



त्याकाळी सर्वात वरचं कोर्ट (प्रिव्ही कौन्सिल) हे इंग्लंडला भरत असे. तिथं जायचं तर पैशाचा प्रश्न होता. न्यायासाठी लढणाऱ्या रखमाबाईबद्दल सहानुभूती वाटणाऱ्या काही इंग्रजांनी 'रखमाबाई बचाव समिती' स्थापन केली. तिला मदत मिळवून देण्याचा प्रयत्न केला. खटल्यातून सुटण्याचा आणखी एक मार्ग तिच्यासमोर होता. तो म्हणजे धर्म बदलण्याचा. ख्रिश्चन धर्म स्वीकारण्याचा. परंतु रखमाबाईने ती वाट धरली नाही. हिंदू राहूनच हक्कांसाठी लढणं त्यांना आवश्यक वाटत होतं. इंग्लंडला संसदेतही या प्रश्नावर आवाज उठला. तिथंही रखमाबाईला सहानुभूती मिळाली. इंग्लंडमधून अनेक स्त्रियांनी वर्तमानपत्रात पत्रं लिहीली. सर्वोच्च न्यायालयात जायचं म्हणजे खूप खर्च येणार. दादाजीलाही इतका खर्च परवडणारा नव्हता, आणि रखमाबाईलाही ते अशक्य होतं. या खटल्यामध्ये तडजोड झाली. रखमाबाईनं दादाजीला दोन हजार रूपये द्यावेत व रखमाबाईनं नांदायला यावं हा आग्रह दादाजीने सोडून द्यावा असं ठरलं. जुलै १८८८ साली या प्रकरणावर पडदा पडला. या प्रकरणात कोर्टामध्ये नवऱ्याच्या मामाचे चारित्र्य चांगले नाही असे रखमाबाईने निवेदन केलं होतं, म्हणून रखमाबाई व तिच्या आजोबाविरूद्ध दादाजीने अब्रूनुकसानीचा दावा लावला. पण त्यातून ती सहीसलामतबाहेर सुटली. दादाजीने तिच्यावर इतरही आरोप केले होते. जयंतीबाईने दुसरे लग्न केल्यामुळे रखमाबाईला तिच्या वडिलांची २५ हजार रुपयांची मालमत्ता मिळाली

होती. ही मालमत्ता स्वत:कडे राहावी म्हणून जयंतीबाई आपल्या लेकीला नांदायला पाठवत नाहीत असाही आरोप त्याने केला. परंतु हे आरोप बिनबुडाचे होते. उलट २५ हजाराच्या मोहापायी दादाजीने कोर्टात केस लावली असे लोक बोलत होते. त्यासाठीच रखमाबाईला नांदायला येण्यास भाग पाडायचा त्याने प्रयत्न केला. परंतु त्यात तो यशस्वी झाला नाही. मानहानी करणारे, प्रचंड मनस्ताप देणारे रखमाबाईच्या आयुष्यातील हे एक प्रकरण अशा रीतीने पार पडले.

## शिक्षणाचा ध्यास

खटला संपला. पण पुढे काय? रखमाबाईने मराठी शाळेत अकरा वर्षांपर्यंत शिक्षण घेतले होतेच. त्यानंतर ती घरी राहूनच इंग्रजी शिकत असे. लग्नाबद्दल तिच्या मनात झालेला तिरस्कार वाढतच गेला.दादाजीने दुसरे लग्न केले. पण रखमा लग्न न करताच राहिली. तिची स्वप्ने वेगळीच होती. तिच्या मनात काही निराळेच घोळत होते. खटला संपल्यानंतर लग्न करून केवळ घर, मुलंबाळं, संसार यात अडकणं तिला नको होतं. पुन्हा एकदा संसारगाडग्याला जुंपून घ्यायचं नव्हतं. रखमाचे वडील सखाराम स्वत: प्रसिद्ध डॉक्टर होते. त्यांचा रखमावर खूप प्रभाव होता. त्यातच वडिलांकडे येणाऱ्या समाजसुधारकांचा व नवीनविचारांचा



तिच्या संवेदनाशील मनावर परिणाम झाला. खूप शिकावं, डॉक्टर व्हावं असे तिला वाटू लागलं. डॉक्टर होऊन आपल्या देशातील गरीब, दीन-दुबळया, रोगग्रस्त स्त्रियांची सेवा करावी असं तिला वाटू लागलं. त्यातूनच समाजातील स्त्रियांची स्थिती सुधारता येईल असा तिला विश्वास होता.

परंतु डॉक्टर व्हायचे तर त्यासाठी कॉलेजात जाऊन शिकावे लागणार. आणि आपल्या देशात अशा बंडखोर मुलीला कोणते कॉलेज प्रवेश देणार? रूढी विरोधी वागणाऱ्या मुलीला प्रवेश देऊन समाजाचा रोष कोण ओढवून घेणार? त्यावेळी अशा मुलींसाठी काही वेगळ्या संस्थांदेखील नव्हत्या. त्यामुळे या समाजापासून दूर जाण्याशिवाय पर्यायच नव्हता. म्हणून मग रखमाबाईनं परदेशी जाण्याची तयारी सुरू केली. त्यावेळी तिचं वय अवघे २२ वर्षांचं होतं. वयाच्या २२ व्या वर्षी आपल्या समाजापासून, कुटुंबापासून हजारो मैल दूर जाण्याचे धाडस रखमाबाईनं दाखवलं. त्यासाठी लागणारा आत्मविश्वास तिच्यात जागृत झाला होता, तसेच त्यासाठी तिच्या आई-वडिल व आजोबांनी देखील तिचं मनोबल वाढविलं.

त्याकाळी इंग्लंड सारख्या पुढारलेल्या समाजात देखील स्त्री डॉक्टरणींची संख्या खूपच कमी होती. त्यामुळे भारतातील स्त्रियांना वैद्यकिय शिक्षण देण्यास तिथे फारसे कुणी उत्सुक नव्हते. तिथेही स्त्रियांच्या उच्चशिक्षणाला, प्रगतीला, तीव

विरोध होता. शिवाय आपल्या देशात तर समुद्र ओलांडून जायला सुद्धा बंदी होती. अशा परिस्थितीत रखमाबाईंनी इंग्लंडला जाऊन शिकून परत येण्याची तयारी दाखवली. पण तिथे त्या राहणार कुठे, त्यांचा खर्च कोण करणार, हे प्रश्न होतेच. मार्ग खडतर होता, पण कठीण नव्हता. इच्छा असली की मार्ग सापडतो,त्याप्रमाणे त्यांना अनेकांनी मदत केली. इथल्या समाजसुधारकांनी, गोऱ्या अधिकाऱ्यांनी व एका गोऱ्या डॉक्टर बाईने त्यांना विशेष साह्य केले. या डॉक्टरणीने इंग्लंडमध्ये वैद्यकिय क्षेत्रातील स्त्रियांना बरीच मदत केली होती. भारतातील स्त्रियांवर व लहान मुलांवर इथल्याच स्त्री डॉक्टर्सकडून उपचार केले जावेत असे त्यांना फार वाटे. स्त्री डॉक्टर तयार होणे, किती गरजेचे आहे असे त्या नेहमी सांगत. त्यांनी मदतीचा हात पुढे केल्यामुळे रखमाबाईंचे पुढील सर्व प्रश्न सुटले. डॉक्टरीणबाईंच्या इंग्लंडमधील मैत्रिणीकडेच रखमाबाईंनी उतरायचे ठरले. त्यानंतर त्या मैत्रिणीनेच सर्व मदत केली.

## इंग्लंडला प्रयाण

१८८९ साली रखमाबाई बोटीने इंग्लंडला गेल्या. तब्बल चार महिन्याच्या प्रवासानंतर त्या इंग्लंडला पोचल्या. इंग्लंडमध्ये त्यावेळी नवविचारांचे वारे वहायला नुकतीच कुठे सुरूवात झाली होती. कारखानदारी वाढली होती.



तिचा फायदा श्रीमंतांना झाला होता. पण गरीबांची स्थिती वाईटच होती. जुन्या परंपरांचा अभिमान इंग्लंडमध्येही दिसत होता. स्त्रियांना समान प्रतिष्ठेची वागणूक दिली जात नव्हती. स्वातंत्र्य, समतेचे विचार लोकांच्या पचनी पडत नव्हते.

रखमाबाईंचे इंग्लंडमधील पालक श्री. व श्रीमती मॅक्लेरन हे श्रीमंत होते तसेच ते थोर विचारांचे होते. समाजाचे ऋण फेडण्यासाठी आपण कार्य केले पाहिजे असे मानणारे होते. श्रीमती मॅक्लेरन या अनाथालयात काम करत असत. त्यावेळी कारखान्यातील कामगारांना न्याय मिळत नसे. त्यांना पुरेसा पगार मिळत नसे. त्यांचे शोषण होत असे. त्याविरूद्ध त्या झगडत होत्या. अशा पालकांमुळे रखमाबाईचा खुपच फायदा झाला. ते विचारांचे स्वातंत्र्य मानत. अन्याय-अत्याचारांविरूद्ध लढा देत. माणुसकीची जोपासना करत. या पती-पत्नीमुळे





रखमाबाईना स्वत:चे विचारही पारखून घ्यायला मदत झाला. त्यांच्यामुळे रखमाबाईचा अनेक सुजाण व्यक्तींशी परिचय झाला. त्या वसतिगृहात राहिल्या.तिथून त्यांनी आपले वैद्यकिय शिक्षण घेतले. नंतर तिथल्याच एका इस्पितळात त्यांनी प्रशिक्षणही पुरे केले. तिथल्या डॉक्टरांच्या हाताखाली काम केले. बाळंतपणाचे शास्त्र व स्त्री रोग चिकित्सा यांचा विशेष अभ्यास केला. त्या परीक्षेत चांगल्या रीतीने उत्तीर्ण झाल्या. त्यांनी दंतवैद्यकाचाही तीन महिने अभ्यास केला.

परंतु चांगल्या गुणांनी पास होऊनही त्यांना पदवी मिळाली नाही. त्याकाळी मुलींसाठी वेगळे कॉलेज असले



तरीही स्त्रियांना पदवी देणे हे लंडन विद्यापीठाच्या नियमात बसत नव्हते. त्यासाठी स्त्रियांना दुसरीकडे जावे लागे. म्हणून पदवी परीक्षेसाठी त्या नंतर स्कॉटलंडला गेल्या. शेवटची पदवी परीक्षाही त्या उत्तम रीतीने पास झाल्या. आणि डॉक्टर बनल्या.

पण शिकत असताना त्या केवळ वैद्यकीय विषयांच्या पुस्तकात अडकल्या नाहीत. बाहेरच्या परिस्थितीचे, सर्वसामान्यांच्या प्रश्नांचेही भान त्यांनी ठेवले. इंग्लंडमधील सार्वजनिक जीवनातही त्या चमकल्या. स्त्रियांवरील अत्याचार, त्यांचा होणारा अवमान याबद्दल तिथे भाषणं दिली. एका समारंभात 'भारतातील स्त्रिया व मुलींचं जीवन' या विषयावर देखील त्यांनी भाषण दिले. आपल्याला मिळालेल्या ज्ञानाचा उपयोग समाजातील समस्या सोडवण्यासाठी करायचे त्यांनी ठरवले.

## भारतात परत

रखमाबाईनी इंग्लंडमधूनच कामा हॉस्पिटलमध्ये वैद्यकीय अधिकारी पदासाठी अर्ज केला. त्यांचा अर्ज मंजूर झाला. १८९५ साली कामावर रूजू होण्यासाठी त्या भारतात परतल्या. सहा महिने या इस्पितळात राहून सर्जनचे काम पाहिले. नंतर त्यांना सुरतच्या इस्पितळात काम करण्याची संधी मिळाली.



भारतात आल्यावर अनेक ठिकाणी त्यांचे सत्कार झाले. पंडिता रमाबाई देखील स्त्रियांसाठी जीवाचे रान करणाऱ्या थोर समाज सुधारक होत्या. विधवा स्त्रियांना आधार देणे, त्यांना आपल्या पायावर उभे राहण्यासाठी मदत करणे यासाठी त्यांनी संस्था काढल्या होत्या. या संस्थांच्या वतीने त्यांनी डॉक्टर रखमाबाईचा गौरव केला. दहा वर्षापूर्वी याच ठिकाणी त्यांना किती झगडावे लागले होते. न्यायासाठी झगडणाऱ्या या स्त्रीची किती निंदानालस्ती झाली होती. पण त्याच ठिकाणी आता त्यांचे कौतुक होऊ लागले.

रखमाबाईंच्या अगोदर परदेशी जाऊन डॉक्टर होणारी पहिली भारतीय स्त्री म्हणजे आनंदीबाई जोशी. त्यांनीही





अतिशय हलाखीत राहिल्या. निंदा, चारित्र्यहनन सहन केले, पण त्या डॉक्टर झाल्या. परंतु शिक्षण पूर्ण करून व्यवसाय करण्याचे भाग्य त्यांना लाभले नाही. व्यवसाय सुरू करण्यापूर्वीच आनंदीबाईचा मृत्यू झाला.डॉ. माणकबाई ह्या दुसऱ्या स्त्री डॉक्टरची अशीच शोकांतिका झाली. पण रखमाबाईंना मात्र खूप वर्षे सर्वसामान्य स्त्रियांची सेवा करता आली. अगदी उतारवयापर्यंत त्यांनी हे काम केले. डॉक्टरीचा व्यवसाय अतिशय कौशल्याने केला. समाजाशी निष्ठेने एकरूप होऊन काम केले. डॉक्टरची प्रतिष्ठा जपली.

त्याकाळी सुरतमध्ये बाळंतपणासाठी इस्पितळात येणे महिलांना संकोचाचे वाटे. घरातच बाळंतपण केले जाई. रखमाबाई घराघरातून स्त्रियांना समजावयास जात असत. इस्पितळात बाळंतपण करणे आरोग्याच्या दृष्टीने कसे फायद्याचे

आहे हे त्या सांगत. बाळाचा आणि बाळाच्या आईच्या जीवाला त्यात कसा धोका नाही हे सविस्तर महिलांना पटवून देत. सुरतेचे हे माळवी हॉस्पिटल आधी घरातच होते. मग पुढे त्याची स्वतंत्र इमारत बांधली. परंतु नवीन इमारतीत यायला स्त्रिया तयार होत नव्हत्या. लोकांच्या मनात शुभ-अशुभाच्या कल्पना होत्या. नवीन इस्पितळ बाळबाळंतिणीला लाभेल का असा संशय महिलांच्या मनातही येई. थोड्याच दिवसात हे रखमाबाईंच्या लक्षात आले. त्यांनी त्यावर एक उपाय केला. इस्पितळाच्या आवारात एका गाभण बकरीला आणले. तिचे बाळंतपण स्वत:च्या हातांनी तिथे केले. बकरी व तिची पिल्लं सुखरूप राहिली. ती बातमी त्यांनी वर्तमानपत्रातून प्रसिद्ध केली. स्त्रियांच्या मनातल्या शंका,कुशंका नाहिशा झाल्या. मग स्त्रिया बाळंतपणासाठी त्या इस्पितळात येऊ लागल्या. आज हे इस्पितळ रखमाबाईंच्या नावाने ओळखले जाते.

बाळंतपणासाठी येणाऱ्या स्त्रियांबरोबर लहान मुलंही असत. ती आवारात इकडे तिकडे दिशाहीन भटकत रहात. अशा बालकांसाठी त्यांनी इमारतीच्या एका खोलीत बालक मंदिर स्थापन केले. त्याला 'मालवी बालक मंदिर' असे नाव दिले. वेळ काढून त्या स्वत: मुलांना शिकवायलाही जात.

डॉ. रखमाबाईंनी बऱ्याच स्त्रियांना खंबीर आणि प्रेमळ





आधार दिला. त्यांच्यामुळे कित्येक जणींना आयुष्यात नीट दिशा मिळाली. स्त्रिया त्यांच्याकडे शिवण टिपण, भरतकाम शिकायला येत. कित्येकजणींना त्यांनी स्वयंपाकाचेही धडे दिले. पण स्त्रियांना त्याकाळी मोकळेपणी घराबाहेर पडणे शक्य नव्हते. घरच्यांचा विरोध होत असे. त्यातून मार्ग काढण्यासाठी त्यांनी धार्मिक पुस्तके वाचून दाखवण्याचे कामही केले. त्या वाचून दाखवत आणि स्त्रिया ऐकत. त्या निमित्ताने स्त्रियांना घराबाहेर तरी पडता येई. त्यांनी २२ वर्षे सुरतमध्ये काम केले. त्यानंतर त्यांनी राजकोट येथे व पुढे सौराष्ट्र प्रांताच्या प्रमुख डॉक्टर म्हणून काम पाहिले. तेथेही त्यांनी अनेक जणींना आधार दिला.

वैद्यकीय व्यवसायामुळे त्या कुटुंबापासून लांब गेल्या

तरी भाऊ-बहिण व भाचरांशी त्यांचे संबंध तुटले नव्हते. भाचरे सुट्टीत त्यांच्याकडे येत जात. त्यांना गोष्टी सांगणे, नवीन पदार्थ खाऊ घालणे ही कामेही त्या आनंदाने करीत. डॉक्टर रखमाबाई कष्टमय जीवन जगल्या. पण त्यांनी सतत संघर्ष केला, बाईला मन असतं, स्वत:चं बरवाईट तिला कळतं, आणि त्याबाबत निर्णय घ्यायचा हक्क तिला आहे हे त्यांनी सिद्ध केले. ह्या संघर्षात त्या कधी डगमगल्या नाहीत. ताठ मानेनं आणि खंबीरपणे त्या उभ्या राहिल्या.

देशाला स्वातंत्र्य मिळालेलं त्यांनी पाहिलं. वयाच्या नव्वदाव्या वर्षी १९५५ मध्ये त्यांची जीवनज्योत मालवली. पण स्त्री स्वातंत्र्याची त्यांनी लावलेली ज्योत मात्र दिवसेंदिवस अधिकाधिक प्रकाशमान होत आहे.

